वन जमिनीचा वनेत्तर वापरासाठी वळतेकरणाचे प्रस्ताव केंद्र शासनाच्या पूर्व संमतीकरिता पाठविण्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या कक्षातील २ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

## शासन निर्णय क्रमांकः एफएलडी-२०१५/प्र.क्र.२५/फ-१०

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ११/१०/२०१९

वाचा :-

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.एफएलडी-१०८३/२९७०/प्र.क्र.४८३/फ-१०, दिनांक १०/०४/१९८६.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.एफएलडी-१९०४/प्र.क्र.१०९/फ-४, दिनांक ०८/०८/२००६.
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.एफएलडी-२०१५/प्र.क्र.२५/फ-१०, दिनांक १३/०३/२०१९.
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ११/०९/२०१९.
५) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र.एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दिनांक १३/०९/२०१९.
६) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-३/यो/प्र.क्र.१/१६-१७/१०५८/१७-१८, दिनांक ३०/०९/२०१९.

**शासन निर्णय :-**

वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत राज्यातील वनक्षेत्र वळतीकरणाचे प्रस्ताव केंद्र शासनाकडे पाठविण्यासाठी प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या कार्यालयात केंद्रस्थ अधिकारी व त्यास अनुषंगिक २७ पदे अशा एकूण २८ पदांची निर्मिती संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये करण्यात आली होती. यापैकी एकूण २६ पदे संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये स्थायी करण्यात आली आहेत. सदर पदांपैकी उर्वरित २ अस्थायी पदे संदर्भ क्र.३ येथील दिनांक १३/०३/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिनांक ३०/०९/२०१९ पर्यंत चालू ठेवण्यास शासनाची मंजूरी देण्यात आली आहे. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भाधीन पत्र क्र.६ अन्वये सदर पदे दिनांक ०१/१०/२०१९ ते दिनांक २९/०२/२०२० या कालावधीत पुढे चालू ठेवण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.४ येथे नमूद सूचनांस अनुसरुन याद्वारे आता खाली दर्शविलेल्या दोन अस्थायी पदांना दिनांक ०१/१०/२०१९ ते दिनांक २९/०२/२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर मुदतवाढ महसूल व वन विभागाने संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या आकृतीबंधात या पदांचा समावेश आहे या अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदाचे नांव | संख्या | कार्यालय |
|---|---|---|---|
| १. | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक व केंद्रस्थ अधिकारी | १ | प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर |
| २. | वनरक्षक | १ | मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), यवतमाळ |

३. या दोन पदांपैकी अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक या पदांच्या वेतनावरील खर्च “प्रधान शीर्ष-२४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेतर) - ०१ - वनीकरण - ००१ - संचालन व प्रशासन - ०१ (०१) मुख्य वनसंरक्षक -०१ (वेतन) (२४०६-००२२-०१)” व वनरक्षक या पदाच्या वेतनावरील खर्च “प्रधान शीर्ष- २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) - ०१ वनीकरण - ००१ संचालन व प्रशासन-०१ (०२) प्रादेशिक वनसंरक्षक ०१ (वेतने) (२४०६-००४२-०१) ” या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०१९-२० मधील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-१००८/प्र.क्र.७०/२००८/वित्तीय सुधारणा-१, दि.१५/०५/२००९ च्या जोडपत्रातील भाग पहिला उपविभाग-३ येथील अनुक्रमांक-४ परिच्छेद २७(२)(क) व शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.११/०९/२०१९ अन्वये प्रशासकीय विभागाना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०१११६३१४०७५१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIRENDRA RAMBAHAL TIWARI

Digitally signed by VIRENDRA RAMBAHAL TIWARI
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, postalCode=400032, street=R AND F D,4TH FLOOR,MANTRALAYA,MUMBAI, ou=FOREST DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VIRENDRA RAMBAHAL TIWARI
Date: 2019.10.11 16:34:41 +05'30'

( वीरेन्द्र तिवारी )

**अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर
५) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), यवतमाळ वनवृत्त, यवतमाळ
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १ व २, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७) महालेखापाल (लेखा परीक्षा) १ व २, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८) कार्यासन वित्तीय सुधारणा / आ.पु.क., वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९) कार्यासन फ-२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) निवडनस्ती फ-१०